राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत श्री. वारणा सहकारी दूध उत्पादक प्रक्रिया संघ लि. वारणानगर, जि कोल्हापूर या संघास निधी वितरीत करण्यास मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः राकृवि २०२०/प्र.क्र.१३६/पदुम-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय- विस्तार, मुंबई ४०० ०३२

दिनांक: २० नोव्हेंबर, २०२०

वाचा : १) शासन निर्णय क्रमांक:राकृवि २०१८/प्र.क्र.७०/पदुम ८ दि. ११.०६.२०२०

२) शासन शुध्दीपत्रक क्र. राकृवि-२०१८/प्र.क्र.७०/पदुम-८, दि.२१.०८.२०२०

३) आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास विभाग यांचे दिनांक २८/०८/२०२० रोजीचे पत्र

४) राकृवियो कक्ष,शासन निर्णय क्रमांक:राकृवि ०३१९/प्र.क्र.९०/१४अे दि.११.०९.२०२०

**प्रस्तावना :-**

शासनाने संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत श्री. वारणा सहकारी दूध उत्पादक प्रक्रिया संघ लि. वारणानगर, जि कोल्हापूर या संघास दूध केंद्र उभारणी व इतर अनुषंगिक बाबींकरितारु २३.६७ कोटी इतक्या रकमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता दिली आहे. उपरोक्त संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत राकृवियो कक्षाकडून सदर संघासाठी रु. १.३५ कोटी इतका निधी उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. सदर निधी श्री. वारणा सहकारी दूध उत्पादक प्रक्रिया संघ लि. वारणानगर, जि कोल्हापूर या संघास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासन या निर्णयान्वये श्री. वारणा सहकारी दूध उत्पादक प्रक्रिया संघ लि. वारणानगर, जि कोल्हापूर या संघास राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत प्राप्त झालेला रु. १.३५ कोटी इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देत आहे. सदर निधी वितरणानंतर राकृवियो हिस्स्यापोटीच्या रु. ११.८३५ कोटीपैकी रु.१०.४८५ कोटी इतका निधी वितरीत करणे शिल्लक राहील. सदर वितरीत करण्यात आलेल्या निधीच्या हिस्स्यापोटीचा ५० टक्के, म्हणजेच रु. १.३५ कोटी इतका निधी संघ हिस्सा म्हणून दूध संघाने गुंतविणे आवश्यक राहील. सदर निधी विनियोजनासंदर्भातील अटी व शर्ती यापूर्वीच्या संदर्भ क्र. १ व २ मधील शासन निर्णयान्वये विहीत केल्याप्रमाणे कायम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०११२०१८०६४३२३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajesh
Shaligram Govil

Digitally signed by Rajesh Shaligram Govil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c549410b2251df8c92783a2da17afcacbe7f8fe3a4fd88f156fea84433871f11, serialNumber=3cec7a5cf8d124a0d8e15bfc85a782c01ef27eaee8bedaba4dce3416562097ac, cn=Rajesh Shaligram Govil
Date: 2020.11.20 18:12:46 +05'30'

**( राजेश गोविल )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१.मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
२.मा. मुख्यमंत्री,महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
३.मा.मंत्री (पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय)/ मा.राज्यमंत्री (पदुम)यांचे खाजगी सचिव
४.विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
५.मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६.प्रधान सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७.सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग
८.आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे
९.आयुक्त दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य,
१०.प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, पुणे
११.विभागीय उपनिबंधक सहकारी संस्था (दुग्ध), पुणे
१२.जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, कोल्हापूर
१३.जिल्हा पशुसंवर्धन उप आयुक्त,कोल्हापूर
१४.जिल्हा अधिक्षक, कृषि अधिकारी, कोल्हापूर
१५.महालेखापाल १/२, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
१६.अध्यक्ष, श्री. वारणा सहकारी दूध उत्पादक प्रक्रिया संघ लि. वारणानगर, जि कोल्हापूर
१७.निवडनस्ती.